# मृत्यूला घाबरु नका

येशू तिला म्हणाला, मी पुनरुत्थान आणि जीवन आहे: जो माझ्यावर विश्वास ठेवतो, तो मेला असला तरी तो जगेल: आणि जो कोणी जगतो आणि माझ्यावर विश्वास ठेवतो तो कधीही मरणार नाही... जॉन 11:25-26



चार सत्ये आहेत जी आपल्याला पूर्णपणे समजून घेणे आवश्यक आहे:

# 1 देव तुमच्यावर प्रेम करतो.

होय, देवाने जगावर एवढी प्रीति केली की त्याने आपला एकुलता एक पुत्र दिला. देवाने आपला पुत्र यासाठी दिला की, जो कोणी त्याच्यावर विश्वास ठेवतो त्याचा नाश होऊ नये तर त्याला अनंतकाळचे जीवन मिळावे. योहान 3:16

चोर चोरी करायला, ठार मारायला आणि नाश करायला येतो. परंतु मी जीवन देण्यासाठी आलो. असे जीवन जे भरपूर आणि चांगले आहे. योहान 10:10

# 2 मनुष्य स्वभावाने पापी आहे. त्यामुळे तो देवापासून वेगळा झाला आहे.

सर्वांनी पाप केले आहे आणि ते देवाच्या गौरवाला उणे पडले आहेत. रोमकरांस 3:23
कारण पापाची मजुरी मरण आहे. परंतु देवाची ख्रिस्त येशूमध्ये दिलेली मोफत देणगी म्हणजे अनंतकाळचे जीवन आहे. रोमकरांस 6:23
आणि जसे लोकांना एकदाच मरण व नंतर न्यायासनासमोर येणे नेमून ठेवलेले असते, इब्री लोकांस 9:27
परंतु भित्रे, विश्वास न ठेवणारे अंमगळ, खुनी, व्यभिचारी, (म्हणजे लैंगिक अनीतीनेवागणारे लोक), चेटकी, मूर्तिपूजा करणारे आणि सर्व खोटे बोलणारे अशा सर्वांना अग्नीने व गंधकाने धगधगणाऱ्यातळ्यामध्ये जागा मिळेल. हे दुसरे मरण आहे. प्रकटीकरण 21:8

## 3 येशू ख्रिस्त हा स्वर्गाचा एकमेव मार्ग आहे.

असे देवाने सांगितिले.
येशूने उत्तर दिले, मी मार्ग, सत्य आणि जीवन आहे. केवळ माझ्याद्वारेच पित्याजवळ जाता येते. योहान 14:6

येशू ख्रिस्ताने तुमच्या पापांची पूर्ण भरपाई केली आहे.
ख्रिस्तदेखील आपल्या पापांसाठी एकदाच मरण पावला. एक नीतिमान दुसऱ्या अनीतिमानांसाठी मरण पावला. यासाठी की, तुम्हाला देवाकडे जाता यावे. त्याच्या आत्म्यासंबंधी म्हटले तर त्याला पुन्हा जीवन दिले गेले. 1 पेत्र 3:18

देवाला सार्वकालिक जीवनाचे वचन आहे.
जो कोणी पुत्रावर विश्वास ठेवतो त्याला अनंतकाळचे जीवन मिळते, परंतु जो पुत्राची आज्ञा पाळीत नाही त्याला अनंतकाळचे जीवन कधीही मिळणार नाही. उलट देवाचा क्रोध त्याच्यावर राहतो. योहान 3:36

## 4 आपल्या तारणासाठी आपण प्रभु येशू ख्रिस्तावर आपला विश्वास ठेवला पाहिजे.

येशू ख्रिस्तावरील विश्वासाने देवाच्या कृपेने आपले तारण शक्य झाले आहे.
कारण देवाच्या कृपेने विश्वासाच्या द्वारे तुमचे तारण झाले आणि ते तुमच्याकडून झाले नही, तर ते देवापासूनचे दान असे आहे. आणि एखादा काही काम करतो त्याचा परिणाम म्हणून नव्हे. यासाठी कोणी बढाई मारु नये. इफिसिकरांस 2:8-9

देवाला ही प्रार्थना विश्वासाने म्हणाः
प्रभु येशू, माझ्यावरील तुमच्या प्रेमाबद्दल खूप खूप धन्यवाद. मी कबूल करतो की मी पापी आहे आणि मी क्षमा मागतो. माझ्या पापांसाठी दंड भरण्यासाठी वधस्तंभावर मरण पावल्याबद्दल धन्यवाद. मी तुमच्या मेलेल्यांतून पुनरुत्थानावर विश्वास ठेवतो. आतापासून, माझा प्रभु आणि तारणहार म्हणून मी तुझ्यावर विश्वास ठेवतो. मी तुझी शाश्वत जीवनाची देणगी स्वीकारतो आणि मी माझे जीवन तुला समर्पित करतो. तुझ्या आज्ञांचे पालन करण्यास आणि तुझ्या दृष्टीस प्रसन्न होण्यास मला मदत कर. आमेन.

पुत्राला पाहून त्याच्यावर विश्वास ठेवणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला अनंतकाळचे जीवन आहे. मी त्या व्यक्तीला शेवटच्या दिवशी उठवीन, हेच माझ्या पित्याल हवे. योहान 6:40

देवाने अंधाराच्या अधिपत्यापासून आमची सुटका केली आणि त्याच्या प्रिय पुत्राच्या राज्यात आणले. पुत्राद्वारे आम्हांला आमच्या पापांची क्षमा मिळाली. कलस्सैकरांस 1:13-14

म्हणून, जर कोणी ख्रिस्तामध्ये आहे, तर तो नवी उत्पत्ति आहे. जुने गेल आहे. नवीन आले आहे! 2 करिंथिकरांस 5:17

काही लोकांनी त्याला आपले मानले. त्यांनी त्याच्यावर विश्वास ठेवला. विश्वास ठेवणाऱ्या सर्वांना त्याने देवाची मुले होण्याचा हक्क दिला. योहान 1:12

चांगले कर्म करणे हे मोक्षप्राप्तीचे साधन नाही तर आपल्या तारणाचा पुरावा आहे.